सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये सक्षम अंगणवाडी या केंद्र पुरस्कृत योजनेकरिता निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२४/प्र.क्र.१६६/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :-१९ मार्च,२०२५

**संदर्भ:-** १) म. व बा. वि. वि. शा. नि. क्र. एबावि-२०२२/प्र.क्र.२३६/का.६, दि. १२.०७.२०२३
२) म. व बा. वि. शासन निर्णय क्र. एबावि-२०२४/प्र.क्र.६४/का.६, दि. ०८.०५.२०२४.
३) केंद्र शासनाचे पत्र क्र. CD-II-१३/२०२४-CD-II (e-११७१२५), दि. २६.०९.२०२४
४) म. व बा. वि. शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.१०८/अर्थ-३, दि. ०८.०१.२०२५
५) म. व बा. वि. शासन निर्णय क्र. एबावि-२०२४/प्र.क्र.१६६/का.६, दि. २०.०१.२०२५.
६) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांचे पत्र क्र. एबाविसेयो/अंगणवाडी/का-७ / अपग्रेडेशन अंगणवाडी सक्षम/६०६१/२०२४-२५, दि. २१.१०.२०२४.

**प्रस्तावना :-**

सक्षम अंगणवाडी या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत राज्यातील केंद्र शासनाने निवड केलेल्या स्वमालकीच्या अंगणवाडी केंद्रांत १) पोषण वाटीका, २) रेन वॉटर हार्वेस्टिंग, ३) आर.ओ. युनिट, ४) एल.ई.डी., ५) अदर इन्फ्रास्ट्रक्चर इत्यादी सुविधा उपलब्ध करून देण्याबाबत केंद्र शासनाने निर्देश दिलेले आहेत. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिताच्या ५८९ अंगणवाडी केंद्रांकरिता रु. ५.८९ कोटी एवढा निधी संदर्भाधीन क्र. २ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. तसेच केंद्र शासनाने सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता राज्यातील १३००६ एवढया अंगणवाडी केंद्रांचे सक्षम अंगणवाडीमध्ये केंद्रांमध्ये रुपांतर करण्याकरिता प्रति अंगणवाडी रुपये १ लाख प्रमाणे रुपये १३०.०६ कोटी निधी अनुज्ञेय केला आहे. त्यानुषंगाने सदर निधी संदर्भाधीन क्र. ५ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. त्याचप्रमाणे केंद्र शासनाने सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये सक्षम अंगणवाडी केंद्राकरिता मंजुर केलेल्या ११५० अंगणवाडी केंद्रांकरिता उपलब्ध करावयाच्या उर्वरित साहित्याच्या अनुषंगाने आयुक्तालयाने संदर्भाधीन क्र. ६ अन्वये सादर केलेला प्रस्ताव व प्राप्त केंद्र हिश्यास अनुसरून तरतूद वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सक्षम अंगणवाडी या केंद्र पुरस्कृत योजने अंतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात अंगणवाडी केंद्रांचे सक्षम अंगणवाडीमध्ये केंद्रांमध्ये रुपांतर करण्याकरिता मंजूर केलेल्या ११५० अंगणवाडी केंद्रांकरिता उपलब्ध करावयाच्या सक्षम अंगणवाडी साहित्य सुविधांपैकी जे उर्वरीत साहित्य सुविधा उपलब्ध करण्यात आले नाही, ते उर्वरीत साहित्य सुविधा उपलब्ध करण्याच्या अनुषंगाने रुपये २.८२५५ कोटी (अक्षरी रुपये दोन कोटी ब्याऐंशी

लाख पंचावन्न हजार फ़क्त) एवढी तरतूद आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांना वितरीत व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| **लेखाशिर्ष** | **अर्थसंकल्पीत निधी २०२४-२५** | **यापूर्वी वितरीत निधी** | **या आदेशान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी** |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| २२३६,पोषण आहार<br>०२,पोषक अन्न व पेये यांचे वितरण,<br>१०१, विशेष पोषण आहार कार्यक्रम,<br>(१०) अंगणवाडीमध्ये सोयी सुविधा पुरविणे,<br>(१०)(०७) अंगणवाडी केंद्रांचे सक्षम अंगणवाडीमध्ये श्रेणीवर्धन (कार्यक्रम) (केंद्र हिस्सा ६०% ) **(२२३६ २६११)**<br>३१, सहायक अनुदाने (वेतनतर) | ७९७९.१३ | ७८०३.६० | १६९.५३ |
| (१०) (०८) अंगणवाडी केंद्रांचे सक्षम अंगणवाडीमध्ये श्रेणीवर्धन (कार्यक्रम) (राज्य हिस्सा ४०% ) **(२२३६ २६२९)**<br>३१, सहायक अनुदाने (वेतनतर) | ५३१५.४२ | ५२०२.४० | ११३.०२ |
| **एकूण** | **१३२८८.५५** | **१३००६.००** | **२८२.५५** |

२. केंद्र शासनाने यासंदर्भात संदर्भाधीन पत्रांन्वये तसेच वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्याची दक्षता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी घ्यावी.

३. सदर निधी तात्काळ SNA खात्यावर जमा करण्याची कार्यवाही आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांनी करावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि. ०८.०१.२०२५ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३१९१६४८३५६०३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2025.03.19 17:26:50 +05'30'

**(वि. रा. ठाकूर)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता),(लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,

२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई,

३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,

४) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (म.व बा.वि.),जिल्हा परिषद,

५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

६) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,

७) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई,

८) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४७२) / वित्त विभाग (व्यय-६), मंत्रालय, मुंबई,

९) कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

१०) निवड नस्ती -का-६.